राज्य शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना वैद्यकीय उपचार व वैद्यकीय खर्चाचे प्रतिपुर्तीस "प्लॅटिना हार्ट हॉस्पिटल, नागपूर" या खाजगी रुग्णालयास हृदयरोग या आजाराकरीता उपचार व शस्त्रक्रिया करण्यासाठी मान्यता देण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः मान्यता-२०१६/प्र.क्र.२९२/१६/राकावि-२
गोकुळदास तेजपाल रूग्णालय आवार, बी विंग,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१ .
दिनांक : ३ एप्रिल, २०१७

वाचा -

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.जीरुखा- २००० /प्र. क्र. १०१/आरोग्य-३, दिनांक २६.९.२०००.**
२) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.एमएजी-२००८/९/प्र.क्र.१ /आरोग्य-३, दिनांक १९.०३.२००५**
३) **संचालक,आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/राज्य शाकर्म/प्लॅटिना हॉस्पी/ कक्ष-३ /९२६९-७०/टे-११/१६,दिनांक ६ जुन, २०१६.**
४) **संचालक,आरोग्य सेवा, मुबई यांचे पत्र क्र.संआसे/शासनमान्यता/प्लॅटिना हॉस्पी/कक्ष-३/टे-११/१६,दिनांक ६ फेब्रुवारी, २०१७.**

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ व त्या अनुषंगाने वेळोवेळी विहीत केलेल्या नियमांनुसार " प्लॅटिना हार्ट हॉस्पिटल, नागपूर" या खाजगी रुग्णालयास हृदयरोग या आजाराकरीता उपचार व शस्त्रक्रिया करण्याकरीता व त्या प्रित्यर्थ होणा-या वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती अनुज्ञेय ठरविण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर रुग्णालयाने खालील अटींचे प्रकर्षाने पालन करणे आवश्यक राहील.

१) मुंबई सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० मधील कलम ४१ अे नुसार १० % रुग्णांवर मोफत व १० %रुग्णांवर सवलतीच्या दराने उपचार करणे..

२) मुंबई शुश्रुषा गृहे अधिनियम १९४९ अन्वये विहित केलेल्या निकषानुसार प्रशिक्षित वैद्यकीय अधिकारी व कर्मचारी वर्ग उपलब्ध करणे.
३) ज्या आजारावर उपचार करण्यासाठी मान्यता देण्यात आली आहे, त्या आजाराचे संशोधन करण्यासाठी तसेच चाचण्यांअंती झालेल्या निदानानुसार शस्त्रक्रिया करण्यासाठी आवश्यक ती यंत्रसामुग्री रुग्णालयामध्ये उपलब्ध असणे.
४) शासकीय रुग्णालयात ज्या दराने फी आकारली जाते त्या दराने फी आकारली जावी.
५) केंद्र शासन, राज्य शासनामार्फत कार्यान्वित केलेल्या राष्ट्रीय कार्यक्रमांच्या मोहिमेमध्ये सक्रीय सहभाग घेणे आवश्यक आहे.
६) सदर रुग्णालयाने मुंबई नर्सिंग होम ॲक्टनुसार नोंदणीचे वेळोवेळी नुतनीकरण करणे आवश्यक राहील.

२. वरीलप्रमाणे मान्यता दिलेल्या आजारांसंबधीच्या उपचार व शस्त्रक्रियेकरीता सदर रुग्णालयाने आकारलेल्या वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती विहीत नियमानुसार अनुज्ञेय राहील. अतितात्काळ बाब वगळता सदर रुग्णालयातील मान्यताप्राप्त उपचाराखेरीज अन्य कोणत्याही औषधोपचारासाठी शासकीय कर्मचा-यास प्राधिकृत वैद्यकीय अधिका-यांची पूर्वसंमती घेणे आवश्यक राहील.

३. हा शासन निर्णय मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.सभापती व मा.उपसभापती, महाराष्ट्र विधान परिषद, मा.अध्यक्ष व मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळाचे मा.विरोधी पक्षनेते तसेच महाराष्ट्र विधानसभा / परिषदेचे विद्यमान सदस्य, माजी सदस्य, मा.न्यायमूर्ती आणि त्यांच्या कुटुंबियांना सुध्दा लागू राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०३१७४६१९४७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7256abb8dd472637941e581488fb02eda9e0d6b701c434bcf471a0d525f80681, cn=Sanjay R More
Date: 2017.04.03 17:53:43 +05'30'

**सं.रा.मोरे**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
१) राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री, (सार्वजनिक आरोग्य विभाग), मंत्रालय, मुंबई.

४) मा. राज्यमंत्री, ( सार्वजनिक आरोग्य विभाग), मंत्रालय, मुंबई.
५) मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मंत्रालय, मुंबई.
८) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई .*
९) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई .*
१०) विभागीय आयुक्त (सर्व)
११) पोलीस आयुक्त / पोलीस अधिक्षक (ग्रामीण) - (सर्व)
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई.
१४) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), नागपूर.
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१७) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१८) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१९) संचालक, आयुर्वेद, मुंबई.
२०) संचालक, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
२१) व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो-फार्मास्युटीकल कॉर्पोरेशन, परेल, मुंबई.
२२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
२४) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२५) जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
२६) महाप्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.*
२७) प्रोथोनोटरी व सिनियर मास्टर, उच्च न्यायालय, मुंबई.*
२८) व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.
२९) सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना), मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर शासन निर्णय त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख व कार्यालयप्रमुख यांच्या निदर्शनास आणून द्यावा.
३०) संचालक, प्लॅटिना हार्ट हॉस्पिटल, धनश्री कर्मशियल कॉम्पलेक्स, हॉटेल हरदेव जवळ, सीताबर्डी, नागपूर-४४० ०१२.
३१) निवड नस्ती - (राकावि-२)

*पत्राद्वारे